शासनाने प्रदान केलेल्या शासकीय जमिनींवरील सहकारी गृहनिर्माण संस्था मधील सदनिका लिव्ह ॲन्ड लायसन्स तत्वावर वापरण्यासाठी देण्यासंदर्भात क्षेत्रीय महसुली अधिकारी व प्राधिकारी यांना स्पष्टीकरणात्मक दिशानिर्देश देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः जमीन-२०१९/प्र.क्र.४०/ज-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक : ०७ जानेवारी, २०२०.**

संदर्भ :- **१.** महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ चे कलम ३७अ

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ आणि त्याखालील महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीची विल्हेवाट करणे) नियम, १९७१ यामधील तरतुदी तसेच वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयांच्या आधारे राज्यात सहकारी गृहनिर्माण संस्थांना शासकीय जमीन निवासी प्रयोजनार्थ प्रदान करण्यात आलेली आहे.

अशा शासकीय जमिनीवरील सहकारी गृहनिर्माण संस्थांमधील सदनिका leave and licence agreements च्या आधारे वापरण्यासाठी दिल्यास आकारावयाची अनुज्ञप्ती फी व जिल्हाधिकारी यांची पूर्व परवानगी यांसदर्भात क्षेत्रीय महसूली अधिकारी व प्राधिकारी यांना स्पष्टीकरणात्मक दिशानिर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त पार्श्वभूमीवर, शासकीय जमिनीवरील सहकारी गृहनिर्माण संस्थांमधील सदनिका leave and licence agreements च्या आधारे वापरण्यासाठी देताना आकारावयाची अनुज्ञप्ती फी व जिल्हाधिकारी यांची पूर्व परवानगी यांसदर्भात महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ आणि त्याखालील महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीची विल्हेवाट करणे) नियम, १९७१ अन्वये प्राप्त अधिकारात क्षेत्रीय महसूली प्राधिकारी व अधिकारी यांना पुढील प्रमाणे स्पष्टीकरणात्मक दिशानिर्देश देण्यात येत आहेत :-

**(अ)** महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ३७अ मधील तरतुद पाहता त्यामध्ये विक्री, हस्तांतरण, पुर्नविकास, वापरातील बदल, विकास हक्कांचे हस्तांतरण, अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांकाचा वापर इत्यादि बाबींच्या अनुषंगाने राज्य शासनाच्या पूर्व परवानगी संदर्भात तरतुद

असून, त्यामध्ये leave and licence या तत्वाचा समावेश नाही. तसेच सहकारी गृहनिर्माण संस्थांमधील सदनिका leave and licence च्या कराराने वापरण्यास दिल्यामुळे संबंधीत सदनिकेच्या मालकीचे तसेच भाडेपट्ट्याचे हस्तांतरण होत नाही. अशा leave and licence च्या करारामुळे केवळ संबंधित सदनिकेच्या वापराचा अधिकार (permissive right of use) संबंधीत व्यक्तीला दिला जातो. यास्तव, शासकीय जमिनींवरील सहकारी गृहनिर्माण संस्थांमधील सदनिका leave and licence या तत्वावर वापरण्यासाठी देताना, जिल्हाधिकारी यांची पूर्व परवानगी आवश्यक नाही, किंवा त्यांना याबाबत अवगत करण्याची गरज नाही, तसेच, या करिता कोणतीही **"अनुज्ञप्ती शुल्क"** आकारण्याची अथवा वसूल करण्याची गरज नाही.

(ब) सदर निर्देशाप्रमाणे तात्काळ कार्यवाही करण्यात यावी.

**०२.** सदर शासन निर्णय हा विधी व न्याय विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४३०/२०१९/व्यय-९, दि.०४/१२/२०१९ अन्वये प्राप्त सहमतीन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक **२०२००१०७१६४६१२९७१९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAMESH SHIVAJI CHAVAN

Digitally signed by RAMESH SHIVAJI CHAVAN
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=7ada4e8fa11566f3b9c9f7b5fa123945d54f8e3d5b09d05bedfa09b97ee45cad, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=eb458b05e05ee27f435bd399537405d44e1c88021cf038b060ac10b9d8fb8787, ou=REVENUE, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAMESH SHIVAJI CHAVAN
Date: 2020.01.07 17:25:59 +05'30'

**(रमेश चव्हाण)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, यांचे स्वीय सहायक
७) नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे.
९) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.

१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
११) सर्व विभागीय आयुक्त / सर्व जिल्हाधिकारी
१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
१३) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१६) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
१७) सर्व सहसचिव / उपसचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) सर्व "ज" समूह कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) निवड नस्ती (कार्यासन ज-१)

********